**ग्राहक संरक्षण कायदा, १९८६**
**राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदावर श्री.अविनाश केशवराव झाडे यांची नियुक्ती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्रासंक- २०१७/प्र.क्र.८७ /ग्रासं-४**
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १२ जुलै, २०१७

वाचा :-

१) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २०००.
२) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे क्रमांक: एससी/ महा /ईएसपी-३/निवडसमिती/ २०१७/ ६५, दिनांक २५ मे, २००७ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ च्या तरतुदीनुसार ग्राहकांच्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी राज्यामध्ये राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगामध्ये गैरन्यायिक सदस्य नेमणुकीबाबत दिनांक २२/०५/२०१७ रोजी निवडसमितीची बैठक संपन्न झाली. या बैठकीमध्ये श्री. अविनाश केशवराव झाडे यांची राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदी (Non-Judicial) नियुक्ती करण्याची शिफारस करण्यात आली. त्यानुसार राज्य ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या कलम १६ (३) नुसार श्री. अविनाश केशवराव झाडे यांची राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदी खालील अटींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदरची नियुक्ती प्रथम ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाची ६७ वर्षे पूर्ण होई पर्यंत किंवा पुढील आदेशापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत देण्यात येत आहे.
२) त्यांनी या पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून १ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी (Probation Period) राहील.
३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० च्या नियम ७ मधील पोटकलम १ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार वेतन व भत्ते देय राहतील.
४) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे गैरन्यायिक सदस्य आयोगाच्या कामासाठी दौऱ्यावर असताना राज्य शासनाच्या प्रथम श्रेणी अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेला प्रवास व दैनिक भत्ता मिळण्यास पात्र असतील. परंतु त्यांना विमानप्रवास तसेच वातानुकूलित प्रथम वर्गाचा रेल्वे प्रवास अनुज्ञेय असणार नाही.
५) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम २००० मधील ७ (४) व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार त्यांना त्यांच्या पदावरुन दूर करता येईल.
६) ग्राहक संरक्षण कायदा १९८६ कलम १६ (१) (ब) (२) नुसार अध्यक्ष राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग महाराष्ट्र यांना असलेल्या अधिकारान्वये त्यांनी वेळोवेळी स्थापित केलेल्या राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग महाराष्ट्राच्या संबंधित पीठावर नियुक्त उमेदवार काम करतील. तसेच,

लोकहितास्तव किंवा प्रशासकीय कारणास्तव आवश्यक वाटल्यास त्यांची बदली राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग किंवा राज्य आयोगाच्या परिक्रमा खंडपीठात करण्यात येईल.

७) त्यांच्या सेवाविषयक बाबी ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० व त्यामधील सुधारणेनुसार असतील.

८) ही नियुक्ती वैद्यकीय तपासणी व पोलीस पडताळणी अहवालाच्या अधीन राहून, ज्यांचे पोलीस पडताळणी अहवाल योग्य नसतील / त्यामध्ये काही प्रतिकुल शेरे नमूद केलेले असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

९) राज्य आयोगाच्या गैरन्यायिक सदस्यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० मधील तरतुदीनुसार त्यांच्या पदावरुन दूर करता येईल.

१०) सदर गैरन्यायिक सदस्यांची नियुक्ती त्यांनी विहित नमुन्यातील शपथपत्र व हमीपत्र लिहून दिल्यानंतर व त्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यानंतर प्रभावी होईल.

११) गैरन्यायिक सदस्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत त्यांनी पदभार न स्विकारल्यास याबाबत राज्य आयोगाशी अथवा शासनाशी संपर्क न साधल्यास त्यांची नियुक्ती आपोआपच रद्दबातल होईल.

२. उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक एम-२ "२४०८- अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१) ०१" या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागवावा.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्र. २०१७०७१३१७१४५०७९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Raju Kalluji Narpande

Digitally signed by Raju Kalluji Narpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c9bb69da44e8b03c93d1a880163547bbb4787f2f2839b6277a288182cbf623cb, cn=Raju Kalluji Narpande
Date: 2017.07.13 17:11:39 +05'30'

**( राजू क. नरपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
६. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सह सचिव, ग्रासं-४, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
९. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई

१०.महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

११.महालेखापाल- (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (द्वारा वित्तीय सल्लागार व उपसचिव)

१३.श्री. अविनाश केशवराव झाडे, गैरन्यायिक सदस्य, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.

१४. निवडनस्ती/ग्रासं-४.